संगणक संकेतांक २०१०१०२०१७३७३४००१

**महाराष्ट्र जैव तंत्रज्ञान धोरण, २००१**
**महाराष्ट्र जैव तंत्रज्ञान विकास निधी रद्द करणेबाबत.**

महाराष्ट्र शासन
शासन निर्णय क्र. बीटीएच-२००६/प्र.क्र.१४८२ /उद्योग-२
उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
**दिनांक :- १० मार्च,२००८**

वाचा :- १) शासन निर्णय क्र. बीटीएच-२००१/(५०५८)/उद्योग-२, दिनांक २९ जानेवारी, २००२
२) शासन निर्णय क्र. बीटीएच-२००१/(५०७८)/उद्योग-२ दिनांक २९ ऑक्टोबर,२००२
३) सह सचिव वित्त विभाग यांनी विशेष कार्य अधिकारी, उद्योग विभाग यांना लिहिलेले क्र.अंदाज १०००/प्र.क्र.५०/अर्थसंकल्प-१, दिनांक १ मार्च,२००८ चे अर्धशासकीय पत्र

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्राचे जैव तंत्रज्ञान धोरण उपरोक्त क्रमांक-१ येथील दिनांक २९.१.२००२ च्या शासन निर्णयान्वये जाहीर करण्यात आले आहे व धोरणाची अंमलबजावणी सुरु आहे. सदर धोरणात प्रस्ताविल्याप्रमाणे दिनांक २९ ऑक्टोबर,२००२ च्या शासन निर्णयान्वये विशेष जैव तंत्रज्ञान निधी उभारण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. तद्‌नंतर अर्थसंकल्प पारदर्शक व जनसुलभ करण्यासाठी गठीत करण्यात आलेल्या डॉ. गोडबोले समितीने केलेल्या शिफारशीनुसार राज्याने निर्माण केलेले राखीव निधी रद्द करण्यासाठी वित्त विभागाने मंत्रिमंडळाच्या मान्यतेसाठी प्रस्ताव सादर केला होता. त्यास मंत्रिमंडळाने दि. ३.५.२००७ च्या बैठकीत मान्यता दिली असून रद्द करावयाचा निधींमध्ये जैव तंत्रज्ञान विकास निधीचा समावेश आहे.

**शासन निर्णय :**

महाराष्ट्रातील जैव तंत्रज्ञान क्षेत्राला चालना देण्यासाठी व जैव तंत्रज्ञानाला प्रचार व प्रसार महाराष्ट्र राज्यात करण्यासाठी यापुढील प्रत्येक आर्थिक वर्षात आवश्यक असलेला निधी अर्थसंकल्पातून उपलब्ध करून देण्यात येईल. यास्तव हा निधी वेगळयाने ठेवण्याची गरज नाही म्हणून विशेष जैव तंत्रज्ञान विकास निधी या आदेशान्वये रद्द करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

छाया अग्निहोत्री
**( छाया अग्निहोत्री )**
कक्ष अधिकारी

प्रति,
मा.मुख्यमंत्री
मा.उपमुख्यमंत्री
मा.मंत्री (उद्योग)
मा.राज्यमंत्री (उद्योग)
मा.मुख्य सचिव
डॉ.रघुनाथ माशेलकर, अध्यक्ष, महाराष्ट्र जैव तंत्रज्ञान आयोग (भूतपूर्व सचिव, वैज्ञानिक व औद्योगिक संशोधन विभाग आणि महासंचालक वैज्ञानिक व औद्योगिक परिषद, नवी दिल्ली)
सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव
प्रधान सचिव (उद्योग)
विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय (२ प्रती)
मुख्य कार्यकारी अधिकारी,महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई
उपमुख्य कार्यकारी अधिकारी (जैव तंत्रज्ञान) तथा खजिनदार, विशेष जैवतंत्रज्ञान विकास निधी,मऔविमं,मुंबई
सहाय्यक संचालक (वित्त व लेखा), उद्योग संचालनालय,मुंबई
महालेखापाल महाराष्ट्र-१(लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता),नागपूर
महालेखापाल महाराष्ट्र-२(लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता),मुंबई
सहसंचालक (अर्थसंकल्प-१) लेखा व कोषागारे , वित्त विभाग
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
सहसंचालक(तांत्रिक) संगणक शाखा, लेखा व कोषागारे, नवीन प्रशासन भवन,५ वा मजला, मुंबई
वित्त विभाग (अर्थसंकल्प-१३ व व्यय-१६ शाखा), मंत्रालय, मुंबई / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
कक्ष अधिकारी (प्रशासन-१) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग /निवड नस्ती (उद्योग-२)

F:\Bio Tech\BTH Fund -१४८२.doc